**मा.शंकरराव चव्हाण विष्णुपुरी उपसा सिंचन योजना, ता.जि.नांदेड १३२ के.व्ही. कळयंत्र आवारातील बे.क्र.१ व बे.क्र.२ च्या विद्युत उपकरणांची दुरुस्ती, पुरवठा,उभारणी,चाचणी इत्यादी कामांचा विशेष दुरुस्ती प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः प्रमाप्र-२०१७/(प्र.क्र.२४९ /२०१७)/सिं.व्य.(कामे)**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
तारीख: ३१. ०८. २०१७

**वाचा :-**

**संदर्भः**-१) कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद यांचे पत्र क्र.गोमपाविम/नांपामं/विष्णुपुरी/तां-३/३५४५,दि.५/५/२०१७

२) शासन निर्णय संकीर्ण २०१६/(२७/२०१६)/लपा-२, दि. २६/५/२०१७

**प्रस्तावना :-**

मा. शंकररावजी चव्हाण विष्णुपुरी प्रकल्प आशिया खंडातील मोठा उपसा सिंचन प्रकल्प आहे. सदर प्रकल्पाचे बांधकाम सन १९९० साली पूर्ण झाले असून सिंचन व्यवस्थापनाकडे हस्तांतरीत झाले आहे. या प्रकल्पाकरीता नांदेउ शहराच्या वरील बाजूस अंदाजे १० कि.मी. अंतरावर गोदावरी नदीवर बंधारा बांधण्यात आला आहे. सदर बंधाऱ्याची लांबी ३२१ मी. इतकी असून उजव्या कालव्याची लांबी ४९ कि.मी. (अस्तरीकरणाचे) आहे. या प्रकल्पांतर्गत बंधारा, पंपगृह १३२ के.व्ही.स्वीचयार्ड, उध्दरनलिका ३.८७ किमी आहे. शेतकऱ्यांनी रब्बी पिके घेतली असून पिके मोड येण्याच्या अवस्थेत आहेत व पिकांना पाण्याची अत्यंत आवश्यकता आहे. मागील दोन वर्षात दुषकाळी परिस्थिती होती व यावर्षी अतिवृष्टीमुळे शेतकऱ्यांच्या खरीप पिकांचे नुकसान झाल्याच्या पार्श्वभूमीवर शेतकऱ्यांच्या रब्बी हंगामातील उत्पादनावर खूप अपेक्षा आहेत. त्यामुळे कोणत्याही परिस्थिती खंडीत झालेला विद्युत पुरवठा सुरु करण्याची मागणी विधानसभा सदस्य नांदेड, दक्षिण यांनी दिनांक १९/१२/२०१६ रोजी झालेल्या बैठकीच्या इतिवृत्तात निदर्शनास आणले आहे. **सदर काम केल्यामुळे खरीप व रब्बी हंगामातील उत्पादनात वाढ होणार आहे.** या अनुषंगाने १३२ केव्ही स्विचयार्डमधील बे.क्र. १ व बे.क्र.२ च्या विद्युत उपकरणांची (लायटनिंग अरेस्टर,आय सोलटर, १४५ के.व्ही. SF६ सर्किट ब्रेकर, १५ एम.व्ही.रोहित्र इत्यादी.) दुरुस्ती,पुरवठा, उभारणी व चाचणी कामांच्या करावयाच्या कामांच्या प्रस्तावास विशेष दुरुस्ती अंतर्गत संदर्भ क्र. २ येथील शासन निर्णयान्वये विभागास देण्यात आलेल्या अधिकाराचा वापर करुन प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद अंतर्गत नांदेड जिल्हयाच्या, शंकरराव चव्हाण विष्णुपुरी उपसा सिंचन योजनेच्या विशेष दुरुस्तीच्या संदर्भ क्र. १ येथील पत्रान्वये प्रस्तावित कामांच्या रु. ४,४६,४९,५००.००/- व अनुषंगिक खर्च रु. १३,३९,४८५.००/- अशा एकूण

४,५९,८८,९८५.००/- (रु. चार कोटी एकोणसाठ लक्ष अठ्ठयाऐंशी हजार नऊशे पंच्याऐंशीं फक्त) एवढया खर्चाच्या प्रस्तावास खालील अटींच्या अधिन राहून सोबतच्या प्रपत्रानुसार प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

१) शासन परिपत्रक क्र. प्रमा -२०१३/ (७८५/१३)/सिं.व्य.(कामे), दि. ०१.०१.२०१५, मधील मार्गदर्शक सूचना नुसार अभिलेखे ठेवणे व कार्यवाही करणे बंधनकारक आहे.

२) प्रकल्पावरील पाणी वापर संस्थेकडे संपूर्ण लाभक्षेत्र हस्तांतरणाचे नियोजन काम सुरु करण्यापूर्वी करावे, कामे पूर्ण झाल्यानंतर लाभक्षेत्र पाणी वापर संस्थेस हस्तांतरण करावे.

३) अंदाजपत्रकात गृहीत धरलेले आराखडे/ संकल्पने व दरसूची बाहय बाबी व वहन अंतरे सक्षम स्तरावर तपासून अंदाजपत्रकास तांत्रिक मान्यता प्रदान करावी.

४) प्रकल्पावरील कामे जलसंपदा विभागाच्या यांत्रिकी संघटनेकडे उपलब्ध मशिनरी करावीत. तथापि, यांत्रिकी संघटनेकडे मशिनरी उपलब्ध नसल्यास तसे प्रमाणपत्र यांत्रिकी संघटनेकडून प्राप्त करुन घ्यावे.

५) कामाचा खर्च उपलब्ध अनुदानातून प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेत व नियोजित वेळेत पूर्ण करण्यात यावा.

६) सदरच्या कामांचा कार्यारंभ आदेश काढण्यापासून कामे पूर्ण होईपर्यंत त्रैमासिक प्रगती अहवाल शासनास सादर करावा . काम पूर्ण झाल्यानंतर त्याबाबतचे प्रमाणपत्र शासनास त्वरीत उपलब्ध करून द्यावे.

प्रस्मावित कामासाठी होणारा खर्च ४७०१ मोठे व मध्यम पाटबंधारे प्रकल्प यावरील भांडवली खर्च (योजनांतर्गत) विस्तार व सुधारणा विशेष दुरुस्ती १०(०२) गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळास भाग भांडवली अंशदान (४७०१ जे १४९) या मुख्य लेखाशिर्षाखाली प्रस्तावित करण्यात येत आहे.

या कामास प्रदान करण्यात आलेली प्रशासकीय मान्यता सिं.व्य.(कामे) कार्यासनाच्या नोंदवहीमध्ये क्र. ३३ सन २०१७-१८ मध्ये नोंदविण्यात आलेली आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक २०१७०८३११४४९५६२३२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात आला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

**सोबत** :- परिशिष्ट-अ

Sanjiv Arunkant Tatu

Digitally signed by Sanjiv Arunkant Tatu
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=WATER RESOURCES DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2d4c9d30f88b6a2745465552d33743e7c967f8c7a5d287520a1c61013a9d322a, cn=Sanjiv Arunkant Tatu
Date: 2017.08.31 14:40:39 +05'30'

**( सं.अ.टाटू )**
**शासनाचे उप सचिव**

**प्रत,**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव.
२) मा.मुख्यमंत्री यांचे कार्यालय.
३) मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष, विधानसभा, विधानभवन, मुंबई.
४) मा.सभापती/उपसभापती, विधानपरिषद, विधानभवन, मुंबई.
५) मा.विरोधीपक्षनेते, विधानसभा, मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन, मुंबई.
६) मा.विरोधीपक्षनेते, विधानपरिषद, मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन, मुंबई.
७) मा.मंत्री,जलसंपदा यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
८) प्रधान सचिव (जलसंपदा) यांचे स्वीय सहायक,जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई.
९) सचिव (जसंव्य व लाक्षेवि) यांचे स्वीय सहायक,जलसंपदा विभाग, मंत्रालय,मुंबई.
१०) महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता /लेखापरीक्षा),महाराष्ट्र राज्य,मुंबई.
११) महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता /लेखापरीक्षा),महाराष्ट्र राज्य,नागपूर.
१२) कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळास औरंगाबाद.
१३) मुख्य अभियंता (जसं), जलसंपदा विभाग, औरंगाबाद.
१४) मुख्य अभियंता (वि), जलसंपदा विभाग,मुंबई.
१५) आंतरवित्त सल्लागार व उप सचिव,जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६) अधीक्षक अभियंता, नांदेड पाटबंधारे मंडळ, नांदेड
१७) अधीक्षक अभियंता, घाटघर (विवयां) मंडळ, कळवा, ठाणे.
१८) कार्यकारी अभियंता, नांदेड पाटबंधारे विभाग (उत्तर), नांदेड
१९) कार्यकारी अभियंता, गोदावरी जलविद्युत व उपसा सिंचन विभाग, औरंगाबाद.
२०) सिं.व्य. (कामे) कार्यासन संग्रहार्थ.

# परिशिष्ट -अ

## शासन निर्णय क्रमांकः प्रमाप्र-२०१७/(२४९ /२०१७)/सिं.व्य.(कामे) दि. ३१. ०८. २०१७ चे सहपत्र

| Sr.No. | Description | Amount |
|---|---|---|
| 1 | Part-A<br><br>Special Repairs Work of Bay No.1 & Bay No.2 of 132/6.6 Kv.Switch-yard (for Renovation Work) at Shri Shankarrao Chavan Vishnupuri project, Tal. Dist.Nanded. | Rs.3,99,80,190.00 |
| 2 | Part- B<br><br>Hiring Charges for Bay No 1 & Bay No.2 of 132/6.6 kv.Switch-yard | Rs.46,69,310.00 |
| | **Total** | **Rs. 4,46,49,500.00** |
| 3 | **Add 3 % Contingencies** | **Rs. 13,39,485.00** |
| | **Total** | **Rs. 4,59,88,985.00** |

Sanjiv Arunkant Tatu

Digitally signed by Sanjiv Arunkant Tatu
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=WATER RESOURCES DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2d4c9d30f88b6a2745465552d33743e7c967f8c7a5d287520a1c61013a9d322a, cn=Sanjiv Arunkant Tatu
Date: 2017.08.31 14:41:57 +05'30'

( सं.अ.टाटू )
शासनाचे उप सचिव